माथाडी/सुरक्षा रक्षक मंडळांमार्फत माथाडी कामगार/ सुरक्षा रक्षकांच्या वेतनातून पतसंस्था/सहकारी बँका/राष्ट्रीयकृत बँकांकडून घेतलेल्या कर्जाच्या हप्त्याच्या कपातीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र. बैठक-२०१९/प्र.क्र.१८२/कामगार-५**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : १४ ऑक्टोबर, २०२०**

**वाचा :-** १. शासन निर्णय क्र.एसजीए-२०१६/प्र.क्र.०४/कामगार-५, दि.२८/०९/२०१८.
२. शासन निर्णय क्र.युडब्ल्युए-२०१८/प्र.क्र.७०९/कामगार-५, दि. ०५/०३/२०१९.
३. मा.उच्च न्यायालय, मुंबई याचिका क्रमांक ५४२७/२०१९ मध्ये मा. उच्च न्यायालयाचे दि. ०३/०५/२०१९ रोजीचे आदेश.
४. मा.उच्च न्यायालय, मुंबई याचिका क्रमांक १२५७/२०१९ मध्ये मा. उच्च न्यायालयाचे दि. ११/०७/२०१९ रोजीचे आदेश.
५. मा.उच्च न्यायालय, मुंबई याचिका क्रमांक १५०९७/२०१९ मध्ये मा. उच्च न्यायालयाचे दि.०४/०१/२०१९, दि. १७/१२/२०१९ रोजीचे आदेश.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र माथाडी, हमाल व इतर श्रमजीवी कामगार (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम १९६९ व महाराष्ट्र खाजगी सुरक्षा रक्षक (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम १९८१ मधील मालक व मूळ मालक या व्याख्येनुसार माथाडी मंडळे तसेच सुरक्षा रक्षक मंडळे ही मालक किंवा मूळ मालक या संज्ञेमध्ये मोडत नसल्यामुळे शासनाच्या संदर्भिय दि. २८/०९/२०१८ व ०५/०३/२०१९ च्या शासन निर्णयान्वये या दोन्ही मंडळामार्फत अनुक्रमे माथाडी कामगार व सुरक्षा रक्षकांच्या वेतनातून पतसंस्था/सहकांरी बॅका/राष्ट्रीय बँकाकडून घेतलेल्या कर्जाच्या हप्त्याच्या कपाती न करण्याबाबत शासन निर्णय निर्गमित करण्यात आलेला आहे.

२. या संदर्भात मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिका क्र. ५४२७/२०१९ व इतर यामध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि. ०३/०५/२०१९ रोजी आदेश दिलेला असून त्यामध्ये माथाडी मंडळामार्फत माथाडी कामगारांच्या वेतनातून / मजूरीमधून पतसंस्था / सहकारी बँका व राष्ट्रीयकृत बँका यांच्याकडून घेतलेल्या कर्जाच्या हप्त्यासंदर्भातील शासनाच्या उपरोक्त दि. ०५/०३/२०१९ च्या शासन निर्णयात कपात न करण्याबाबत घातलेले निर्बंध उठवण्यासंदर्भात अंतरीम स्थगिती दिलेली आहे. मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिका क्र. १२५७/२०१९ मध्ये दि. ११/०७/२०१९ च्या आदेशान्वये वरीलप्रमाणे दिलेली अंतरीम स्थगिती सुरक्षा रक्षक मंडळामार्फत सुरक्षा रक्षकांच्या वेतनातून पतसंस्था / सहकारी बँका व राष्ट्रीयकृत बँका यांच्याकडून घेतलेल्या कर्जाच्या

हप्त्यासंदर्भातील शासनाच्या उपरोक्त दि. २८/०९/२०१८ च्या शासन निर्णयासंदर्भात देखील लागू करण्याचे आदेश दिलेले आहेत. त्या अनुषंगाने अर्जदार पतसंस्था यांच्या कपातीच्या अनुषंगाने माथाडी / सुरक्षा रक्षक मंडळाकडून कार्यवाही करण्यात येत आहे. या संदर्भानेच उपरोक्त याचिका क्रमांक ५४२७/२०१९ व १२५७/२०१९ व इतर याचिका व्यतिरीक्त अर्जदार नसलेल्या पतसंस्थाच्या कपातीसंदर्भात निर्णय घेण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिका क्र. ५४२७/२०१९ व १२५७/२०१९ या व इतर याचिकांमधील मा. उच्च न्यायालयाच्या दि. ०३/०५/२०१९ व ११/०७/२०१९ रोजीच्या आदेशांच्या अनुषंगाने कार्यवाही करणे शासनावर बंधनकारक आहे. त्यानुसारच वसुलीसंदर्भात कार्यवाही चालू राहणे अपेक्षित आहे. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या आदेशानुसार अर्जदार पतसंस्थांच्या कपातीच्या अनुषंगाने कार्यवाही चालू असताना या याचिकेमध्ये अर्जदार नसलेल्या पतसंस्थांना देखील दिलासा देणे आवश्यक असल्यामुळे सर्वच पतसंस्था/पतपेढयांच्या वसुली संदर्भाने मा. उच्च न्यायालयाच्या दि. ०३/०५/२०१९ व ११/०७/२०१९ च्या आदेशाच्या अनुषंगाने वसुली संदर्भात कार्यवाही करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. तथापि, ही मान्यता खालील अटी व शर्तीवर देण्यात येत आहे.

१. माथाडी/सुरक्षा रक्षक मंडळांच्या माथाडी कामगार/सुरक्षा रक्षक यांना ज्या-ज्या पतसंस्था अथवा सहकारी बँका/राष्ट्रीयकृत बँका इ. यांनी दिलेल्या कर्जाच्या हप्त्याची कपात त्या-त्या माथाडी/सुरक्षा रक्षक मंडळांनी करावी.
२. कपाती संदर्भात संबंधित पतपेढी/पतसंस्था/सहकारी बँका व राष्ट्रीयकृत बँका यांचे अध्यक्ष व लेखाधिकारी/सचिव यांच्या स्वाक्षरीने दर आर्थिक वर्षामध्ये मागणी व वसुलीचे विवरणपत्र मंडळास सादर करण्यात यावे.
३. दिलेल्या कर्जाच्या व्याजाचा दर आणि कर्जाची व्यक्तीगत मर्यादा तसेच कर्ज परतफेडीचा कालावधी ही जबाबदारी संबंधित पतसंस्थांची राहील याची जबाबदारी मंडळ अथवा शासनावर राहणार नाही.
४. पतपेढी/ पतसंस्थांच्या थकीत कर्जाच्या वसुली अथवा परतफेडीसंदर्भात शासन कोणत्याही प्रकारे जबाबदार राहणार नाही.
५. माथाडी/सुरक्षा रक्षक मंडळ यांच्याकडून कपातीसंदर्भात मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र. १५०९७/२०१९ मध्ये दि. १७/१२/२०१९ रोजी दिलेल्या अंतरीम आदेशांचे पालन होईल याची संपूर्ण जबाबदारी संबंधीत मंडळांवर राहील.
६. या प्रकरणी मा. उच्च न्यायालयात दाखल असलेल्या सर्व याचिकांसंदर्भात मा. उच्च न्यायालयाच्या अंतिम आदेशानंतर, त्या आदेशाच्या अनुषंगाने आवश्यक आदेश शासनाकडून निर्गमित करण्यात येतील.

सदर आदेश मा.उच्च न्यायालयात प्रलंबित याचिका क. ५४२७/२०१९ व इतर याचिकेमधील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२०१०१४१४३०१२४११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR

Digitally signed by DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRIES, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=feb24b5f5d1512bb47f7bae5ad1db4953358cd43c999bdf0814c6bb78364d50a, cn=DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR
Date: 2020.10.14 15:51:41 +05'30'

**( डॉ. श्रीकांत ल. पुलकुंडवार )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१. राज्यपाल यांचे सचिव (पत्राने)
२. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय,मंत्रालय,मुंबई
३. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
४. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, अ-६, मंत्रालय समोर, नरिमन पॉईट, मुंबई,
५. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
६. मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
८. सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई-३२,
९. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय यांचे स्वीय सहाय्यक, मुंबई,-३२,
१०.शासकीय अभियोक्ता, मा.उच्च न्यायालय, मुंबई,
११.कामगार आयुक्त, कामगार भवन, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा, मुंबई,
१२.सर्व सह/ उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१४.अध्यक्ष, सर्व माथाडी/सुरक्षा रक्षक मंडळे,
१५.सर्व अवर सचिव /कार्यासन अधिकारी, कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई,
१६.निवड नस्ती (कामगार-५).